**मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई**
**सन २०१६-१७ साठी भाग भांडवल अंशदान वितरित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मौआम - २०१६/प्र.क्र.११७/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा -**

**१) अल्पसंख्याक विकास विभाग : शासन निर्णय क्रमांक : अविवि-२००८/१७१०/प्र.क्र.२३०/०८/ का.८, दि.०६ जून, २०१३.**

**२) वित्त विभाग : शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि.२० एप्रिल, २०१६.**

**३) शासन परिपत्रक क्रमांक : अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक: बीयुडी-२०१४/प्र.क्र.४३(भाग-१)/का.७, दि.२० एप्रिल, २०१६.**

**प्रस्तावना :-**

मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळाचे अधिकृत भाग भांडवल रु.५००.०० कोटीपर्यत वाढविण्यास दि.०६ जून, २०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आतापर्यंत महामंडळास रू. ३७५.६९१० कोटी भाग भांडवल देण्यात आले आहे. मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळाला भागभांडवली अंशदान, (४२३५०२३३) ३२ - अंशदान या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये रु.२५.०० कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त) इतका निधी भागभांडवल म्हणून अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. तसेच संदर्भांकीत क्र.२ येथील वित्त विभागाच्या दि.२० एप्रिल, २०१६ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता भांडवली योजनेसाठी अर्थसंकल्पीत निधी वितरणाची मर्यादा १०० % इतकी राहील, अशा सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यास अनुसरुन मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांना सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता रु.२५.०० कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त) इतके भागभांडवल वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांना सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता रु.२५.०० कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त) इतका निधी भागभांडवल म्हणून वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त भागभांडवल मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांना प्रदान करण्यासाठी अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर महामंडळास उक्त रक्कम एकरकमी पध्दतीने त्वरीत अदा करण्यात यावी.

३. सदर रक्कमेचा ई.सी.एस. अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे नावे काढण्यात यावा.

४. वरील भाग भांडवली अंशदानाच्या अनुषंगाने होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. **लेखाशिर्ष :-**

मागणी क्रमांक झेडई-२,

४२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च

०२, समाजकल्याण,

१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूक (योजनांतर्गत),

राज्य योजनांतर्गत योजना,

(०१) महामंडळांना सहाय्य,

(०१)(०२) मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळाला भागभांडवली अंशदान (४२३५ ०२३३) ३२ अंशदान.

६. मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळास उपलब्ध करुन देण्यात आलेल्या भागभांडवलाचे प्रमाणपत्र (शेअर सर्टिफिकेट) महामंडळाने शासनास सादर करावे. कर्जवसुलीबाबत सर्व उपाययोजना प्रभावीपणे राबविण्यात याव्यात. नवीन कर्जाच्या अर्जांचे ऑन लाईन नोंदणीकरण, कर्ज मंजूरी आदेशासोबत लाभार्थ्यांस व जामिनदारास कर्ज परतफेड तक्ता देण्यात यावा. सदर भाग भांडवल हे योजनांतर्गत निधीतील असल्यामुळे अल्पसंख्याक विकास विभाग व वित्त विभागाव्दारे मंजूर केलेल्या योजनांवरच हा निधी खर्च करण्यात यावा. सदरचा खर्च करण्यापूर्वी यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील अटींची तसेच वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांची पूर्तता करण्यात यावी.

७. निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे /प्रक्रियेचे अवलंबून/वित्तीय अधिकारांच्या (financial power) मर्यादेत/PWD मॅच्युअलचे अधीन राहून/ C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार/CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शा.नि./ नियम/ परिपत्रक/ तरतूदीनुसार/बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग/अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ यांची राहील.

८. “वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या दि.२० एप्रिल, २०१६ च्या शासन परिपत्रकामधील परिच्छेद क्र. ७ ते १८ मधील अटींची पुर्तता तसेच सदर परिपत्रकासोबत जोडलेल्या प्रत्येक परिशिष्टातील अटींची पुर्तता करण्यात आली आहे.”

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०२१५१७०५२८६९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2017.02.16 11:53:23 +05'30'

**( समीर साळुंखे )**

अवरसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा ), मुंबई
३) सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख शाखेमार्फत)
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई
९) वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय -४ व साउ) मंत्रालय, मुंबई
१०) नियोजन विभाग (कार्या.१४७५)
११) रोख शाखा व का.७, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती, का.८